**अधिसूचना**
**महसूल व वन विभाग**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक :- ०४ मार्च, २०२४**

**महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५**

क्रमांक :- एस-१०/२३/प्र.क्र.२२६/फ-४, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ६ मधील दुसऱ्या परंतुकानुसार वनक्षेत्रपाल आणि इतर गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्यांचे अधिकार, कलम ७ मधील तरतुदीनुसार शासन अधिसूचना, महसूल व वन विभाग क्र.एफएसटी-०७/२१/प्र.क्र.१८४/फ-४, दिनांक २८.०७.२०२१ अन्वये क्षेत्रीय स्तरावर प्रत्यार्पित करण्यात आले होते. सदर अधिसूचना याद्वारे रद्द करण्यात येत आहे. उक्त अधिनियमातील कलम ६ (ख) मधील तरतुदीनुसार वन विभागातील वनक्षेत्रपाल व इतर गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या सर्व प्रकारच्या बदल्या करण्यासाठी सक्षम प्राधिकारी मा. मंत्री (वने) (विभागाच्या सचिवांशी विचार विनिमय करून) राहतील.

२. वनक्षेत्रपाल व इतर गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदलीबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारस करण्यासाठी खालीलप्रमाणे नागरी सेवा मंडळ स्थापन करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (वने) | अध्यक्ष |
| २ | प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख),महाराष्ट्र राज्य, नागपूर. | सदस्य |
| ३ | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग),महाराष्ट्र राज्य, नागपूर. | सदस्य |
| ४ | उप सचिव / सह सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ५ | उप सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य सचिव |

३. प्रस्तुत अधिसूचनेतील तरतुदी तात्काळ लागू होतील. तथापि, या अधिसूचनेच्या दिनांकापूर्वी वर नमूद दि.२८.०७.२०२१ रोजीच्या अधिसूचनेनुसार केलेल्या कार्यवाहीस कोणतीही बाधा येणार नाही.

४. सदर अधिसूचनेची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक क्र.२०२४०३०४१७५५५३६६१९ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

BHAGWAN MARUTI SAWANT

Digitally signed by BHAGWAN MARUTI SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=8ee89eb0aec64f8bc0bdf8d85ddb4706d35abd8b73c618e114ee98d5c9ecf57b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C7DBA1C6B5F7AB2A6CABC4F7EAD8CFA74F8F7A0FADCAC76D8F1CF22569F16BD3, cn=BHAGWAN MARUTI SAWANT
Date: 2024.03.04 18:29:52 +05'30'

(भगवान सावंत)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत :-
१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.

६. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव (वने) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास महामंडळ, नागपूर.
११. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१२. सर्व मुख्य वनसंरक्षक/ वनसंरक्षक
१३. सर्व मुख्य / प्रादेशिक व्यवस्थापक, महाराष्ट्र वन विकास महामंडळ मर्यादित.
१४. सर्व वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण.
१५. सर्व उपवनसंरक्षक.
१६. वन विभागातील सर्व कार्यासने.
**१७.** निवडनस्ती फ-४ कार्यासन